# नवम खंड

—०—

## स्वानंदयोग

सूत :- शौनकादि मुनिहो! दक्षाने मुद्गलाला विचारले:- 'पूर्णपद देणारा जो योग आहे त्याचे स्वरूप, कसे? स्वानंद हा कोणत्या प्रकारचा योग आहे? व तो कोणत्या प्रकारचा अयोग आहे? आणि शांति देणारा जो पूर्णयोग त्याचे रूप कसे आहे ते मला सांगा. मुद्गल म्हणाला: स्वानंदापासून नेति, सम, सत्, असत्, अशी चार ब्रह्मे सहज व ब्रह्माच्या स्वेच्छेने आतांच सांगितलेल्या क्रमाप्रमाणे निर्माण झाली. नंतर स्वानंदाच्या सत्तेने या चार ब्रह्मांनी (१) सांख्यरूपी ब्रह्म (सर्वज्ञ), (२) बोधरूपी ब्रह्म (विज्ञान) नंतर (३) अहंरूपी, निर्गुणब्रह्म व (४) बिंदुरूपी सगुण, ही चार ब्रह्मे होत. यानंतर स्थूलसूक्ष्मादि चार प्रकारची विश्वे निर्माण झाली. पण हे सर्व पदार्थ परस्पर-भिन्न होते. तेव्हां या सर्वांनी ) तपश्चर्या केली आणि प्रतिदिवशी ज्ञानस्वरूप व ज्ञान देणाऱ्या स्तोत्रांचा नियमाने पाठ करून मूलभूत स्वानंदवासी गणेशाचे एकनिष्ठ भजन, पूजन केले. तेव्हां प्रसन्न होऊन स्वानंदवासी गणेशाने सर्वांस त्यांची त्यांची कर्मे नेमून दिली, आणि त्या त्या कर्मास लागणाऱ्या ज्ञानाचाही उपदेश केला. गणपतींनी असेही वचन दिले की, 'तुमच्या जगद्व्यापाररूप कर्माला सिद्धि मिळावी म्हणून मी तुमच्याजवळ नेहमी वास्तव्य करीन.'

## स्वानंदाचा अयोग-योगभ्रष्ट व त्याचा उद्धार

**सूत :-** मुनिहो ! गणपति हे नानायोगाचे अधिपति आहेत. ज्या वेळेला त्यांची वृत्ति अयोगनामक योगांत असते, तेंव्हा ते मायाशून्य, नित्य, मुक्त, आणि सुखरूप असतात. या गणेशयोगाने स्वानंदाख्य जे सगुणब्रह्म आहे तें नष्ट होतें आणि गणपतीच्या योगसामर्थ्याने तें पुनः उत्पन्न होतें. अशी ही परब्रह्माची योगात्मक, अयोगात्मक क्रीडा मन आणि वाणी यांना सर्वथा अगोचर आहे. हा गणेशयोग शम, दम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि इतक्या अंगानी सिद्ध होतो. हा योग सांगोपांग सिद्ध झाला तर ब्रह्मज्ञान समजण्याला अतिशय सुलभता प्राप्त होते. योगाभ्यासामध्ये काही मोह उत्पन्न होऊन जर पुरुष पुनः विषय सेवन करूं लागला, अनेकत्व पाहूं लागला, सुखदुःखादिकांचा अनुभव घेऊं लागला, तर त्याच्या पूर्वयोगाभ्यासाने त्याला स्वर्गसुख मिळते; पण हे स्वर्गसुख बाहेरचे असल्यामुळे ( विषयांपासून मिळणारे असल्यामुळे) गणेशभक्ताला हें सुख नरकदुःखाच्या भोगाइतकीच यातना देते. म्हणून हा भोग संपल्यावर तो योगभ्रष्ट पुरुष शहाणा होतो व योगीकुलामध्ये किंवा श्रीमंताच्या घरी जन्म घेऊन पूर्वसंस्काराच्या सामर्थ्याने पुनः योगमार्गाचा अभ्यास करतो आणि शांति मिळवितो.

## चंचल चित्ताला स्थिर करण्याचा व ज्ञानप्राप्तीचा मार्ग

**सूत :-** चंचल चित्ताला स्थिर करावयाचे असेल तर जीवाने प्रथम सत्कर्म करण्यास लागावे. हळूहळू निष्काम कर्माचा अभ्यास करावा म्हणजे त्याच्यायोगाने पूर्वीच्या अनत जन्माचे पातक नाहीसे

व्हावयास लागेल. दृढअभ्यास नंतर पूर्ण निष्काम कर्म करतां येऊं लागले ह्मणजे चित्तशुद्ध होतें आणि मनाची चंचलता नाहीशी होते. अशा पद्धतीने कर्म चालले असतां गणेशपचायतनापैकी ज्या देवतेवर विशेष भक्ति असेल त्या देवतेची भजनपूजनादिकांनी भक्ति करावयास लागावे व ही भक्तिही परमेश्वरास समर्पण करावी. विषयाविषयीची विरक्ति, सर्व कर्माचे आणि भक्तीचे गणेशार्पण, सर्व विश्व गणेशरूप आहे असे भान, सर्वांचे कल्याण मात्र व्हावे असा भक्तिचा व कर्माचा हेतु, गणेशाचे नित्य स्मरणयुक्तध्यान, योगाचा शास्त्रपूर्वक अभ्यास, तज्जन्यमनोविजय, आणि एकच ब्रह्म सर्वत्र ओतप्रोत भरले आहे हे ज्ञान, या साधनांचा अनन्यभक्तिने व शास्त्रविधिक्रमाने अधिगम केला तर या जन्मांतच ज्ञानप्राप्ति ( म्हणजे पूर्ण आणि शुद्ध शांतिप्राप्ति ) हा लाभ होतो.

## गणपतीच्या विभूति

सूत :– गणपतीनी एका वेळी नारदाला आपल्या कांही विभूति सांगितल्या होत्या. त्यापैकी कांहीचा मात्र मी आता उल्लेख करतो. तो ऐका:– गणपति म्हणतातः ‘ योगामध्ये मी चित्तनिरोध करणारा मायाशून्य, वस्तूंमध्ये मी अयोग, निजभूतांमध्यें ( शक्ति, सूर्य, विष्णु आणि शंकर या चार ब्रह्मांमध्यें ) मी अव्यक्त नावाचा स्वानंद, समभावांमध्ये आनंद, जीवांमध्ये आत्मा, नानाभेदामध्यें मी असद्रूप ब्रह्म, सद्वस्तूंमध्ये बोध, देहाभिमान्यांमध्ये मी सद्रूप, देहांमध्ये मी बिंदुरूप, कोशामध्ये मी आनंदकोश, सूक्ष्मजातीमध्यें विज्ञान, विवेकांमध्ये मी मन, चालकामध्ये मी वायु, स्थूलांमध्ये मी अन्न, पुरुषांमध्ये मी ईश्वर, व्यष्टीमध्ये मी प्राज्ञ, इंद्रियांमध्ये मन, भूतांमध्ये

शब्दस्पर्शादिगुणामध्ये मी शब्द, देवतांमध्ये मी गुण-
आकाश, शब्दस्पर्शादिगुणामध्ये जनार्दन, नाशकामध्ये मी हर, उत्पादको-
पालनकर्ता, पालकांमध्ये जनार्दन, नाशकामध्ये मी हर, उत्पादकां-
मध्ये मी ब्रह्मा, कर्माचा सूर्यरूपी आत्मा मोहकांमध्ये शक्तिदेवी,
देवांमध्ये इंद्र, आदित्यांमध्ये विनायक, तेजस्वी वस्तूंमध्ये मी भानु,
अमृतामध्ये चंद्र, प्रताप्यांमध्ये मी अग्नि, समप्रवृत्तीमध्ये ( निःपक्षपात
आचरणांमध्ये ) मी धर्म, नियमाने चालणाऱ्या लोकांमध्ये मी यम,
जलांमध्ये वरुण, राक्षसांमध्ये मदन, भोगामध्ये रति, नागेशांमध्ये शेष,
सर्पांत तक्षक, नागात वासुकी, द्वीपात मिष्ट, जलाशय, पर्वता-
मध्ये हिमालय, वृक्षात शमी, देववृक्षांत मंदार, धेनूंमध्ये कामधेनू,
औषधि वनस्पतीमध्ये दूर्वा, पक्ष्यांमध्ये मयूर, मृगात सिंह, मासामध्ये
श्रावण, चौरामध्ये पूषकपति वाहनात, अश्वरथ, ऐश्वर्यात सिद्धी,
विद्यांमध्ये बुद्धि, प्रकाशकांमध्ये चित्त, वेदवंतामध्ये चित, मोहकांमध्ये
मी अभिमान, नरांमध्ये राजा, वर्णामध्ये ब्राह्मण, आश्रमामध्ये संन्यास
पोषकांमध्ये गृहस्थाश्रमी, त्यागांमध्ये अवधूत, तिथीमध्ये चतुर्थी,
प्रजापतींत दक्ष, ब्रह्मर्षीत भृगु, देवर्षीत नारद, अवधूतांत दत्त,
तत्ववेत्त्यांत कपिल, योग्यांत शुक, विदेह्यांत जनक, विरक्तांत
सनकादि चार कुमार, ज्ञात्यांत व्यास, कर्मकृत्यांत वसिष्ठ,
गाणपत्यांत मुद्गल, एकनिष्ठांत भृशुंडी, ब्रह्मभक्तांत बृहस्पति,
अन्नात तीळ, गव्यांत ( दुग्धदध्यादींत) घृत, रसांत मध, जलचरांत
मकर, नद्यांत कौमंडलि, क्षेत्रांत मयूरक्षेत्र, बुद्धिवंतात काशीराज,
उपासकांत गार्ग्य, ध्याननिष्ठांत गृत्समद, दैत्यांत सुबोध, द्वेष्ट्यांत
ज्ञानशत्रु, दुर्जयांत मन, वर्गात ॐकार, भाविकांत शुक्र, शुद्धचित्तात
मी त्रिशिरा, उपदेशकांत याज्ञवल्क्य, पौराणिकांत सूत, श्रोत्यांत
शौनक, सेनापतींत स्कंद, यशस्व्यांत विष्णु, पापांत असत्य,

भेदधारकांत कलह, प्राप्तव्यांत लोम, मण्यांत चिंतामणि, पवित्र, भावांत (पवित्रवस्तूंमध्ये) ज्ञान, गायनात साम, वेदांत अथर्व, शस्त्रांत परशु, निर्लिप्तांत मी साक्षी, राजश्रीत गज, भ्रामकांत विषय, अप्सरांत रंभा, गंधर्वांत चित्ररथ, वैद्यात शिव, औषधज्ञात्यांत धन्वंतरी, सरोवरांत समुद्र, प्रवाहात जान्हवी, मंत्रांत एकाक्षरी मंत्र, सूक्तांत ब्राह्मणस्पत्य सूक्त, यज्ञांत ज्ञानयज्ञ, प्राणांत समान, शक्तिवंतांत शक्ति, उपनिषदांत बृहदारण्यक, शास्त्रांत योगशास्त्र, अरण्यांत दंडकारण्य, नियमांत दंड, अभिमानांत माया, स्मृतित याज्ञवल्क्यस्मृति, छंदांत गायत्री, नगरांत स्वानंद, कलांत योगकळा, नीतिपंडितांत काव्य, (शुक्र) भूमिचरांत वृषभ, गोजातीत नंदिकेश होय ह्या कांही विभूति तेवढ्या मी सांगितल्या आहेत. सर्व विभूति सांगणे केव्हांही शक्यच नाही. जी जी म्हणून श्रेष्ठ वस्तु आहे ती ती माझी विभूति आहे.'

## तत्त्वविचार

सुत :– मुनिहो! नंतर मुद्गलाने दक्षाला पुनः एकवार तत्त्व-विचार सांगून कर्माविषयी तो म्हणाला: कर्म, अकर्म आणि विकर्म असे कर्माचे तीन प्रकार आहेत. ही स्वरूपे व ह्यांची फळे मागे सांगितलींच आहेत. विकर्माने नरकप्राप्ति, सकाम कर्माने स्वर्गप्राप्ति आणि निष्काम कर्माने मोक्षप्राप्ति ही फळे विसरू नयेत अशी आहेत. स्वर्गाला जाण्याच्या मार्गाला पितृयान किंवा 'कृष्णगति' असे म्हणतात. जन्ममृत्युचे चक्र येथे अखंड चालू राहते. 'मुक्ति' देणाऱ्या मार्गाला देवयान किंवा 'शुक्लगति' म्हणतात. येथे क्रमाक्रमाने मुक्तिचा मार्ग आक्रमिला जाऊन अंती 'मुक्ति' (शांति) मिळते. शुक्लगति व 'कृष्णगति' या मार्गांची रहस्ये तुम्हास ठाऊकच

आहेत. 'शुक्लगति' सूर्यसाक्षित्वाने क्रमशः मोक्षफलोत्पादक होते व कृष्णगति चंद्रसाक्षित्वाने पुनर्जन्माला कारण होते. नंतर मुद्गलांनी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यामधील सर्व प्रसिद्ध भेद, त्यांचे भिन्न भिन्न विकार, सत्वरजादि गुण यांचे विवेचन पुष्कळ विस्ताराने केले; पण ते तुम्हांस ठाऊकच आहे; म्हणून त्याचा विचार येथे करण्याचे कारण नाही. वर्णाश्रमांचा विचार आपण मागे केलाच आहे. येथे इतकेच जास्त सांगावयाचे आहे की, द्विजांनी (विप्र-क्षत्रिय-वैश्यांनी) यज्ञोपवीत धारण करावे.

## ज्ञानाचा अभ्यास

सूत :– नंतर दक्षाने विचारल्यावरून मुद्गलांनी सांगितले की, (१) धर्माने ब्रह्मप्राप्ति होते. धर्म हे ब्रह्मदेवाचे नाव आहे, हा देव सर्वांस सारख्या रीतीने वागवितो. (२) अर्थ हा सामर्थ्य देणारा पुरुषार्थ आहे. अर्थ हे शंकराचे नांव आहे; अर्थ साध्य झाला म्हणजे शिवलोकास जाता येते. अर्थाचा स्वामी शंकर आहे (३) काम हा भोगात्मक आहे. याचा स्वामी विष्णु आहे याने विष्णुलोक मिळतो. काम हे विष्णूचे नाव आहे. (४) सूर्य हा आत्मरूप असून मुक्तिमार्गाचा साक्षी आहे. हे सांगितल्या नंतर मुद्गलाने निरनिराळ्या दर्शनकारांचे अभिप्राय सांगितले व तो म्हणाला (१) नैय्यायिक हे चैतन्यात्मक ब्रह्म सर्वकारण आहे असे मानतात. चैतन्य नाहीसे झाले ह्मणजे सर्वनाश होतो असे त्यांचे मत आहे. आतां गणेशयोगाच्या दृष्टीने चित्ताचे पांच भेद सांगितले आहेत. त्या पांच भिन्न प्रकारांमध्ये जी वस्तु सामान्य आहे, जी वस्तु पांची भेदांमध्ये विद्यमान असते, तीच 'चैतन्यरूप' आहे असे म्हटले म्हणजे गौतम प्रणीत न्याय आणि वेदोक्त गणेशयोग

यामध्ये एकवाक्यताच उत्पन्न होते. ( २ ) कणादप्रमुख तार्किक म्हणतात की, सर्व पदार्थांमध्ये जो अभेद आहे, तोच जगत्कारणरूप ब्रह्म आहे. गणेशयोगाप्रमाणेही चित्तपंचकांतील भेद भेदाशून्य केले, म्हणजे प्रकट होणारा जो अभेद तो व तार्किकांचा अभेद यांमध्ये एकवाक्यताच असते. ( ३ ) धर्मशास्त्रवेत्ते असे म्हणतात की सच्चिद् आत्मा व सोपाधिक आत्मा या उभयतांचाही लय ज्या एकरूप आत्म्यामध्ये होतो, तो ज्ञानैकरूप आत्मा जगत्कारण आहे. आता गणेशयोगाच्या सिद्धांतानुसार पाहिले असतां चित्ताच्या पांच प्रकारांचे जे निरनिराळे धर्म आहेत त्यांचा क्रमाक्रमाने त्याग केला असतां जे एक केवळ ज्ञानरूप शिल्लक राहते, ते व धर्मशास्त्रप्रणीत ज्ञानरूप ही दोन्ही एकस्वरूपच होतात. ( ४ ) सांख्य असे म्हणतात की, संख्या ( मिथ्या भान ) नष्ट झाले म्हणजे जो बोध व विबोध होतो तदरूप म्हणजे बोध–विबोधरूप ब्रह्म जगत्कारण आहे गणेश-योगांत चित्ताचे जे पांच प्रकार सांगितले आहेत, त्यांचे प्रकारत्व नष्ट केले असतां जे एकच बोध-विबोधरूप सर्वव्यापी तत्व शिल्लक रहाते ते व सांख्यांचे बोध-विबोधरूप यांतही भेदभाव उरत नाही. (५) मीमांसक असे म्हणतात की, जगत्कारण हे स्वसंवेद्यरूप आहे. गणेशयोगशास्त्रांतही चित्तपंचकाचा त्याग केला म्हणजे स्वसंवेद्य ब्रह्म शुद्धस्वरूपाने प्रकट होते. ते व मीमांसक ज्याचा उल्लेख करतात ते, हा दोन्ही वस्तूतः एक रूपच असतात. याचप्रमाणे इतर ब्रह्मविषयक सिद्धांत जे आहेत त्यामध्ये आणि गणेशब्रह्मयोगामध्ये पारमार्थिक-दृष्टीने अभेदच दृग्गोचर होतो. तेंव्हा गणेशयोगाचा कोणत्याही दर्शनाशी भेद असत नाही हा योग सर्व मतांचा योग्य तेवढा अंगिकार करून सर्वांहून निराळा व सर्वप्रवर्तक असतो, म्हणून हा सर्वश्रेष्ठ आहे.

सूत :- नंतर मुद्गलाने नित्य, नैमित्तिक, प्राकृत आणि सारस्वत अशा चार प्रकारच्या लयांचे स्वरूप सांगितले. कर्म, अकर्म व विकर्म यांचे लय नित्य असतात; फल उत्पन्न झाले म्हणजे त्या त्या कर्माचा लय होतो. हा लय केवळ कर्माधीन आहे; परंतु हा लय व कर्मकर्त्यांचा लय ब्रह्मदेवाचा एक दिवस संपला म्हणजे होतो. यावेळी स्वर्गमंडळापर्यंत असणाऱ्या सर्व लोकांतील जीवांचा लय होतो. (२) आतां नैमित्तिक लय ब्रह्मदेवाचा एक दिवस व एक रात्र हा काल होय. कृत, त्रेता, द्वापार व कलि ही चार युगे हजार-वेळ फिरली म्हणजे ब्रह्मदेवाचा दिवस होतो. रात्रीची हीच मर्यादा आहे. हा काळ लोटल्यावर जो लय होतो त्याला नैमित्तिकलय म्हणावे. (३) स्थूल, सूक्ष्म आणि सम या तत्वांना एकरूप प्राप्त झाले म्हणजे त्याला प्राकृत लय म्हणावे. (४) वाणीचा आणि मनाचा लय होऊन चित्तांतील पांचही प्रकारांचा लय झाला, संप्रज्ञात व असंप्रज्ञात समाधीचा लय होऊन एकच रूप झाले म्हणजे त्याला सारस्वत लय असे म्हणतात.

हे सर्व ज्ञान केवळ ग्रंथाच्या अभ्यासाने व्हावयाचे नाही. पूर्ण श्रद्धेने, गुरुची सेवा करून व गणेशाची एकनिष्ठ भक्ति करून गुरूनी सांगितलेल्या सिद्धांताचे मनन आणि निदिध्यास जेंव्हां अखंड चालेल; तेंव्हां गणेशयोगाचे व गणेश--ब्रह्माचे ज्ञान होईल. हा अभ्यास चालला असतां बिंबरूपाने देह--निर्वाहापुरते मात्र भोग घ्यावे, सर्वकर्म व सर्व ज्ञान गणेशाला अर्पण करावे, नित्य गणेश--गुणांचे कीर्तन करावे, त्याचे विस्मरण केव्हांही होऊ नये. 'तो सर्वश्रेष्ठ, सर्वसाक्षी व मत्स्वरूपी आहे' अशी भावना ठेवावी, आपली वाणी गणेशमय असावी व संगति गणेश भक्तांचीच

असावी. पाखंडी लोकांच्या वाऱ्याला उभें राहू नये आणि चित्ताच्या पांच प्रकारांमध्ये जे ज्ञान होते त्यावर कोणत्याही प्रकारची भक्ति न ठेवता एक गणेशभजनच अंतःकरणामध्ये ठेवावे हा अभ्यासाचा व अध्ययनाचा विधि आहे. या विधीने ज्ञानविज्ञानाचा लाभ लवकर होतो.

**सूत** :– याप्रमाणे दक्षाला मुद्गलाने योग पद्धतीचे रहस्य सांगितले. ते ऐकून दक्षाला अतीशय आनंद झाला. त्याच्या सर्व शंका नष्ट झाल्या, त्याचे अंतःकरण भक्तिमय झाले. त्याला ब्रह्मज्ञान झाले आणि विज्ञान देण्यासाठी त्याच्यापुढे प्रत्यक्ष गणेशाची मूर्ति प्रकट झाली. परमेश्वराची दक्षाने स्तुति केली व पूजा केली. गणेश साक्षात्काराचा हा समारंभ पाहण्यास स्वर्गाचे सर्व देव व भूलोकावरील ऋषि आले होते त्यांनीही मुद्गलाची व गणपतीची पूजा केली. जिकडे तिकडे सर्वत्र आनदी आनंद झाला. दक्षाने मुद्गलाची व्यासपूजा केली आणि त्याचा शक्य तेवढा सत्कार करून मोठ्या कष्टाने त्याला निरोप दिला.

**सूत** :– मुद्गल हा गणपतीचा एक अवतारच होता असे म्हणावयास हरकत नाही. याने सर्व भिन्नमतांमध्ये ऐक्य कसे आहे, ते दाखविले आहे. या पुराणांत गणपतीचे रूप आठ प्रकारचे वर्णिले आहे. ब्रह्मा, विष्णु, शिव, सूर्य, व शक्ति ही पांची रूपें सगुणात्मक ( देहधारी ) ब्रह्मांची आहेत यांची पूजा सर्व कामुक ज्ञानी लोक करतात. या पूजाकर्मांचा एक विपाक असा होतो की कामुक लोक स्वर्गसुख भोगून परत आल्यावर प्रथम ओंकाराची नंतर दहराकाशांत राहणाऱ्या आत्म्याची, नंतर सगुणगणेशाची आणि नंतर योगशांति देणाऱ्या गणेशपरब्रह्माची, पूजा करण्यास

प्रथम प्रेरित होतात. 'ही पूजा निष्काम असावी.' ही त्यांस पुढे बुद्धि उत्पन्न होते आणि ते सहजच मुक्तिच्या मार्गाला लागतात.

## मुग्दल पुराण श्रवणपद्धति व फलश्रुति

गणेशस्वरूप समजण्याला एक मुद्गलपुराणच साधन आहे. व्रतस्थ राहून गणपतीच्या मंदिरांत या पुराणाचे श्रवण कोणत्याही वर्णाश्रमांतील जीवाने शक्य तेवढा वेळ करावे. पुराण समाप्त झाल्यावर उत्सवपूर्वक पोथीची पूजा करून पुराणिकाचीही संभावना यथाशक्ति उत्तम प्रकाराने करावी. या श्रवणाचे फळ निष्काम भक्तांस मोक्ष-दायक, कामुक पुरुषांची इच्छापूर्ति करणारे, आणि शेवटी ज्ञान देणारे, सारांश सर्व श्रोत्यांस कमिअधिक कालांतराने मोक्षमार्गाला नेणारे आहे. या पुराणाच्या पारायणांनी अनेक लोकांस येथे सुखोपभोग व अंती मोक्ष योग यांची प्राप्ति झाली आहे. रोग, पिशाचे, भ्रम इत्यादि बाधांच्या दुःखामुळे ज्यांस आपली आयुष्य यात्रा असह्य झाली होतो त्यांनी या ग्रंथाचे श्रवण पठण केल्यावर त्यांची सर्व दुःखे लयाला जाऊन त्यांस शेवटी ज्ञानप्राप्ति झाली आहे.

असो; या अमृताच्या वाचकांसही गणेशचरित्राच्या ज्ञानाने, त्याच्या निर्गुण व सगुण रूपांच्या बोधाने, त्याच्या योगरहस्याने, व त्याच्या व्रतचरणाने इहलोकी सात्विक सुख व परलोकी अक्षय शांति मिळावी व स्वधर्माकडे त्याची प्रवृत्ति असावी असा आशीर्वाद देऊन सूताने मुद्गल विरचित पुराणाचे प्रवचन संपविले. गणेश-ब्रह्माचे व योगाचे ज्ञान झाल्यानंतर शौनकादिकांनीही सूताचे धन्यवाद गाऊन त्याला यथेष्ट संचार करण्याची अनुज्ञा दिली व आपण गणेश–भक्ति करत राहिले.

[नववें खंड समाप्त.]

* * *